GR-20040407143230001-01000

मंत्रीमंडळात नव्याने समाविष्ट झालेल्या २३
मंत्री व ३० राज्यमंत्री यांच्या आस्थापनेसाठी
सावधी पदे निर्माण करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : एमआयएन - २००३/प्र.क्र.२२/२००३/२१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १४.२.२००३

वाचा : १) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्र.एमआयएन - १०८६/५४/२१, दि.१५ मार्च, १९८६.

**शासन निर्णय :-**

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एमआयएन - १०८६/५४/२१, दिनांक १५ मार्च, १९८६ अन्वये शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार मंत्री / राज्यमंत्री आस्थापनेवर खाली दर्शविल्यानुसार कर्मचारी आकृतिबंध अनुज्ञेय आहे.

| मंत्री कार्यालय | | | राज्यमंत्री कार्यालय | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | पदनाम | एकूण पदे | अ.क्र. | पदनाम | एकूण पदे |
| १ | खाजगी सचिव | १ | १ | खाजगी सचिव | १ |
| २ | स्वीय सहायक | ३ | २ | स्वीय सहायक | ३ |
| ३ | लघुलेखक | २ | ३ | लघुलेखक | २ |
| ४ | लिपिक-टंकलेखक | २ | ४ | लिपिक-टंकलेखक | १ |
| ५ | वाहनचालक | १ | ५ | वाहनचालक | १ |
| ६ | चोपदार | १ | ६ | चोपदार | १ |
| ७ | शिपाई / संदेशवाहक | ५ | ७ | शिपाई / संदेशवाहक | ४ |
| | | १५ | | | १३ |

२. मंत्रीमंडळाचे स्थापनेनंतर वरीलप्रमाणे सावधी पदे प्रत्येक मंत्री / राज्यमंत्री आस्थापनेसाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एमआयएन - १०९९/प्र.क्र.१७४/९९/२१, दिनांक १ नोव्हेंबर, १९९९ अन्वये मंजूर करण्यात आली होती. त्याच धर्तीवर मंत्रीमंडळात २३ मंत्री व ३० राज्यमंत्री यांचा दि.२५.१.२००३ (म.पू.) रोजी समावेश केला असल्याने त्यांच्या कार्यालयीन आस्थापनेवर दि.२५.१.२००३ (म.पू.) पासून सध्याच्या मंत्रीमंडळाच्या पदावधीपर्यन्त ७३५ सावधी पदे निर्माण करण्यास शासन मंजुरी देत आहे.

३. सदर पदावर नियुक्ती / प्रतिनियुक्तीसाठी कोणत्या संवर्गातील शासकीय / निमशासकीय कार्यालये/स्वायत्त संस्था महामंडळे इ. मधील अधिकारी / कर्मचारी पात्र असू शकतील, याबाबतचा तपशील परिशिष्ट -"अ" व "ब" मध्ये दर्शविला आहे.

४. मंत्री / राज्यमंत्री आस्थापनेवर नियुक्त करण्यात येणा-या अधिकारी / कर्मचा-यांना (बाहेरील उमेदवार वगळून) मंत्री आस्थापनेवर असेपर्यन्त त्यांचे श्रेणी वेतन + इतर सर्व अनुज्ञेय भत्ते ( विशेष कार्यभत्ता वाहनचालक व चतुर्थश्रेणी कर्मचा-यासाठी ) देय होतील. तसेच शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : पीओआय-१०९९/प्र.क्र.३/९९/का.२१, दिनांक ८.१२.१९९९ अन्वये त्यांना विशेष वेतन अनुज्ञेय राहील.

५. मंत्री आस्थापनेवरील सर्व वाहनचालकांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : पीएवाय -१०९०/प्र.क्र.२८८/९०/२१, दिनांक २४.६.१९९२ अन्वये दरमहा रु.४२५/- विशेष कार्यभत्त देय राहील. तसेच सर्व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : पीएवाय -१०९२/६७९९/प्र.क्र.३१५/९२/२१, दिनांक १९.६.१९९३ अन्वये दरमहा रु.१५०/- विशेष कार्यभत्ता देय राहील.

६. सदर मंत्री महोदयांच्या कर्मचारी वृंदावरील वेतन, प्रवास खर्च व कार्यालयीन खर्च लेखाशिर्ष "२०५२ - सेक्रेटरीएट सर्वसाधारण सेवा (३) मंत्र्यांचा स्वीय कर्मचारी वर्ग मागणी क्र.ए- ४" याखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. विद्यमान मंत्री व राज्यमंत्री सदस्यांचा वेतन, प्रवास खर्च कार्यालयीन खर्च लेखाशिर्ष "२०१३ - मंत्री परिषद मागणी क्र.ए-२" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सदरहू खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.सीआर - १२६ /२००३/व्यय-४, दिनांक १०.२.२००३ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( म.चिं.पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय,
४) खाजगी सचिव, सर्व मंत्री / राज्यमंत्री कार्यालये,
५) महालेखाकार, महाराष्ट्र - १, मुंबई,
६) महालेखाकार, महाराष्ट्र - २, नागपूर,
७) सामान्य प्रशासन विभाग / का.क्र.२२, २३-अ व ३९,
८) वित्त विभाग / व्यय - ४, बीयुडी - ३, १३,
९) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग /२१ रोख शाखा ( १५ प्रती )
१३) निवड नस्ती.